**गडचिरोली जिल्ह्यातील धानोरा तालुक्यातील जपतलाई - वर्केकसा - तोयागोंदी - मोडेभट्टी - मोहली - भाकरोंडी - मुस्का - खांबाडा - सुरसुंडी हा रस्ता प्रजिमा क्र.४६ ची दर्जोन्नती रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१४४/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक - १९ डिसेंबर, २०१९**

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.का-प्रआ/४७३७, दि. १४/०६/२०१८.

२) शासन निर्णय क्रमांक रवियो २०१८/प्र.क्र.१४४/नियोजन-२, दि.२४.१०.२०१८

३) ग्राम विकास विभागाचे पत्र क्र.मुग्रायो २०१९/प्र.क्र.९४३/बांध-४, दि.१८.१२.२०१९

४) अधीक्षक अभियंता सा.बां.मंडळ, गडचिरोली यांचे पत्र क्र.प्र.क्र.१०३/ तांत्रिक/ प्र.आरे/ २०१९/२८५१, दि.१८.१२.२०१९.

**प्रस्तावना :-**

सचिव (मुमंग्रासयो), ग्राम विकास विभाग यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये शासन निर्णय दि.२४.१०.२०१८ अन्वये दर्जोन्नत केलेल्या प्रजिमा क्र.४६ "जपतलाई - वर्केकसा - तोयागोंदी - मोडेभट्टी - मोहली - भाकरोंडी - मुस्का - खांबाडा - सुरसुंडी" ह्या रस्त्याची दर्जोन्नती रद्द करुन पुर्ववत इजिमा-५० व ४६ करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे.

सदर रस्त्याची सुधारणा, मुख्यमंत्री ग्राम सडक योजनेंतर्गत करण्याकरीता या विभागाने पारित केलेला दि.२४.१०.२०१८ रोजीचा शासन निर्णय रद्द करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

सचिव (मुमंग्रासयो), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई यांचा प्रस्ताव विचारात घेता, गडचिरोली जिल्ह्यातील धानोरा तालुक्यातील जपतलाई - वर्केकसा - तोयागोंदी - मोडेभट्टी - मोहली - भाकरोंडी - मुस्का - खांबाडा - सुरसुंडी हा रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत कण्यास मान्यता दिलेला दि.२४.१०.२०१८ रोजीचा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

परिणामी, १) जपतलाई-वर्केकसा-तोयागोंदी-मोडेभट्टी-मोहली-भाकरोंडी सा.क्र.०/०० ते २४/०० (२४.०० कि.मी.) हा पुर्वीप्रमाणे इजिमा-५० व २) भाकरोंडी-मुस्का-खांबाडा सुरसुंडी रस्ता सा.क्र.०/०० ते १२/०० (१२.०० कि.मी.) हा पुर्वीप्रमाणे इजिमा-४६ झाल्यामुळे रस्ते विकास योजना २००१-२१ मधील गडचिरोली जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **३६.०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१०७९.४७ - ३६.००) म्हणजेच **१०४३.४७ कि.मी.** इतकी होईल. तसेच **इतर**

**जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **३६.०० कि.मी.** ने वाढ होऊन एकूण (१३३८.७५० + ३६.००) म्हणजेच १३७४.७५० **कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२२०१२३६१७८०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2019.12.20 12:38:13 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव(नियोजन) महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी, गडचिरोली.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, गडचिरोली (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, गडचिरोली.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.